**कोल्हापूर मंडळाच्या अधिपत्याखालील १०० खाटांच्या ४ उपजिल्हा रुग्णालयातील (कळबंणी, गडहिंग्लज, सावंतवाडी व कणकवली) १०० अस्थाई पदांना मुदतवाढ.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/प्र.क्र.३८/आरोग्य-४

१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीख: २, मे २०१५

वाचा

**१) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः पीएचसी-१०९७/प्र.क्र.२६/९७/आ-४, दि.१६.०१.२००३.**
**२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः अस्थाई-२०१०/प्र.क्र.१२२/आ-४, दि.१.०२.२०१०.**
**३) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे २०११/ प्र.क्र.८४/ आरोग्य-४, दि.२८.०४.२०११ व दि.४.०५.२०११.**
**४) शासन निर्णय, सा.आ.वि. क्रमांक: अपदे-२०१४/ प्र.क्र.५६/आरोग्य-४, दि.२९.०३.२०१४.**
**५) शासन निर्णय,सा.आ.वि.क्रमांक: अस्थाई-२०१४/प्र.क्र.९९/आरोग्य-३अ, दि.५.०४.२०१४.**
**६) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-३/टे-५/१०० खाटा ४उपजिरु/ अपदे-१००/सन२०१५-१६/१५, दि.३१.०१.२०१५.**

**प्रस्तावना**

उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अधिपत्याखालील १०० खाटांच्या ३ उपजिल्हा रुग्णालये (गडहिंग्लज, सावंतवाडी व कणकवली) येथील ३४ अस्थाई पदांना संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये व १ उपजिल्हा रुग्णालय (कळबंणी) येथील ६६ अस्थाई पदांना संदर्भ क्र.५ अन्वये दि.१.०३.२०१४ ते दि.२८.०२.२०१५ पर्यंत पुढे चालू ठेवण्याची परवानगी देण्यात आली होती. या अनुषंगाने सहसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी प्रस्तावित केल्यानुसार येथील एकूण १०० अस्थाई पदांना दिनांक १.०३.२०१५ ते दि. २९.०२.२०१६ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

कोल्हापूर मंडळाच्या अधिपत्याखालील १०० खाटांच्या ४ उपजिल्हा रुग्णालयातील (कळबंणी, गडहिंग्लज, सावंतवाडी व कणकवली) येथील सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या १०० अस्थाई पदांना सदर पदे सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीकरीता रिक्त नव्हती वा या पदांचा अतिरिक्त

कार्यभार दिलेला नाही, या अटींच्या अधीन राहून ही पदे दिनांक १.०३.२०१५ ते दिनांक २९.०२.२०१६ या कालावधीकरीता चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या पदांपैकी एकही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असल्याचे आढळून आल्यास त्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिका-यांची राहील. सदर पदांबाबत यापुढील मुदतवाढीचा प्रस्ताव सादर करतांना पदांच्या आढाव्याच्या संबंधी पुर्तता करण्यात याव्यात .

सदर पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या मागणी क्रमांकआर -१ मुख्य लेखाशीर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन (०१)(०९)-महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पातंर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयाचे उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन (२२१० ४६२४)" , मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन (०१)(०८) प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रा.रू. इतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३) ", "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०३-ग्रामीण आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ११०-५ इतर रुग्णालये व दवाखाने, (०१)(०१)- कुटीर रुग्णालये (२२१० ०३१५)" व मुख्य लेखाशीर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा,११०-रूग्णालये व दवाखाने, ११०-७पंचवार्षीक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०६) (०१)- मुफसल क्षेत्रातील अध्यापनेवर शासकीय रुग्णालये व दवाखाने (२२१० ०२२६) " या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ )( २००४)/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२९११५४४९७८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात ये त आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.11 13:07:21 +05'30'

**संजय कमलाकर**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई

२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( रूग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.

३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.

४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.

५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर

६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.

७. जिल्हा शल्य चिकित्सक, कोल्हापूर, रत्नागिरी, सिंधुदूर्ग.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर, रत्नागिरी, सिंधुदूर्ग.

९. सर्व वैद्यकीय अधिक्षक संबंधित उपजिल्हा रुग्णालये , कळबंणी, जि.रत्नागिरी/ गडहिंग्लज, जि.कोल्हापूर/सावंतवाडी व कणकवली, जि.सिंधुदूर्ग

१०. वित्त विभाग (व्यय-१३,अर्थसंकल्प-९ ), मंत्रालय, मुंबई.

११.नियोजन विभाग,( कार्यासन-१४५६ ), मंत्रालय, मुंबई.

१२.अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.

१३.निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).